# ।। गुरूचरित्र ।।

## मुक्या मनानें किती उधळावे शब्दांचे बुडबुडे

एका ललित साहित्यिकाची परमार्थ प्रीति!
निष्ठावंत गुरूभक्ताला साजेशी गुरूचरित्रसेवा!

उपकाराची फेड कशानें होईल बरें? शब्द, कष्ट, धन हा सर्व व्यवहार झाला. खरा उपाय एकच आहे कीं, अशा व्यक्तीसाठीं ईश्वराजवळ मन:पूर्वक प्रार्थना करावी. विरोधकांची भूमिका, त्यांची मतें आणि त्यांचा विरोध ध्यानीं घेऊनहि अंत:करणपूर्वक असे म्हणावे वाटतें कीं, आपली ही सेवा गुरूना नि:संशय मान्य होऊन राहिली आहे कारण इतकी ती मोलाची आहे. माझी श्रद्धा आहे कीं, गुरू

आपल्या पाठीशीं आहेत आणि तसे ते सदैव राहतील.

आपल्या 'सुबोध गुरूचरित्र' या पुस्तकानें माझ्यासारख्या अभ्यासकावर परम उपकार झाले आहेत. माझें हें लेखन म्हणजे त्यांतून अंशतः उतराई होण्यासाठीं केलेली केविलवाणी धडपड समजावी.

आपण 'सुबोध गुरूचरित्र' असे नांव दिलें आपल्या भावार्थ ज्ञानेश्वरीप्रमाणें हें 'सुबोध गुरूचरित्र' असणार अशाच भ्रमांत मी होतो. त्यामुळें माझी फसगत झाली. आणि हें गोष्टीरूप, सुरस, चटकदार असेल अशा भ्रमांत असल्यामुळें लोकांची फसगत झाली. ''जगें अवज्ञाचि करावी'' असें हें आपलें धोरण, गुरू प्रेमाने आपण तृप्त झाला आहांत, याचेंच निदर्शक आहें. प्रत्येक ओवीचा, याप्रमाणे संपूर्ण ५१ अध्यायी गुरूचरित्राचा शब्दशः अर्थ लिहून

काढणें हें कार्य आपण कसेंकाय केलें! एवढा दीर्घोद्योग करण्याचें आपण कसें काय मनींमानसीं आणलें! याचा जसजसा विचार करतो, तों तों मन आश्चर्यचकित होतें.

कांहींचें म्हणणें असे कीं, कथा, कादंबरी पुस्तकें लिहिणें हेंच ज्यांच्या उपजीविकेचें साधन आहे; त्यांनी हें गुरूचरित्र लिहिलें तर त्यांत काय नवल? त्यांचा हा न्याय ‘भावार्थ ज्ञानेश्वरी’ सारख्या इतर पुस्तकांना लागू पडतो मात्र ‘सुबोध गुरूचरित्र’ त्यांत मुळीच बसत नाहीं, हें त्यांना आवर्जून सांगणें भाग आहे.

एकतर या लोकांना गुरूचरित्राविषयीं हवी तशी आस्था नसते. या ग्रंथराजाचें केवढे मोल आहें याची जाणीवहि त्यांच्याठायीं नसते. यामुळें आपले इतर साहित्य आवडीने वाचणाऱ्या या वाचक

वर्गाला हे ‘सुबोध गुरूचरित्र’ कांहीं अंशांत नीरस वाटणार हें उघड आहें.

अशा प्रकारचा आहे हा बहुसंख्य वाचक वर्ग. हें अकल्पित कार्य करणारा असा हा लेखक आणि श्रीगुरूकृपेनेच, एऱ्हवी शक्य नाही, कधी नव्हें ती अक्कल आलेला असा मी. अशी ही मौज आहे.

मागे सांगितल्याप्रमाणें मी भ्रमांतच राहिलो होतो. त्यामुळें प्रकाशनपूर्व सवलतीच्या किंमतीचे झळकणारे बोर्ड माझ्या दृष्टीने नगण्य ठरले. माझ्या लेखीं त्याला कांहींहि किंमत राहिली नव्हती. आतां वाटतें केव्हढा तो वेडेपणा! केव्हढा अपराध! केव्हढा स्वतःच्या ज्ञानाचा दर्प! त्यामुळें केव्हढा हा उपमर्द! प्रकाशन झाले. प्रती बाजारांत आल्या तेव्हां आणि तेव्हांच हा मूर्खपणा ध्यानीं आला. चित्ताचा अस्वस्थपणा वाढला. पश्चात्ताप तर झालाच

झाला. 'पापाची संचितें। चित्तासी दंडणा। झाली ऐसे मना। कळो आलें।।'

प्रकाशनपूर्व नांव नोंदणी केली असती तर १० रूपयांत काम झाले असते. आतां १७ रूपये द्यावे लागणार. १० रूपयासाठीं १७ रूपये देणें कां अवघड वाटूं लागले तेंच कळेना! काडीचाहि विचार न करतां ५० रूपयापासून १०० रूपयापर्यन्त पुस्तकें धडाधड खरेदी करीत आलो. तर मग आत्ताच हें असें काय झालें? त्यांतहि पुन्हां सवलतीच्या किंमतीची प्रत तुमच्याकडे आहे कां म्हणून तुम्हांस विचारण्यास तुमच्या घरीं आलो. काय हा वेडेपणा? पुस्तकासाठीं मी वारेमाप पैसा खर्च केला आणि आतां १७ रूपये नको म्हणून १० रूपयासाठीं तुमच्याकडे आलो. सप्टेंबर १९६४ पासून या तळेगांवांत मी कायमचा राहण्यास आलो. तेव्हांपासून आजपावेतों ५

रूपयासहि कुणा पुढे कधी हात पसरला नाही. दुर्मिळ पुस्तकें एकदां वेळ निघून गेली म्हणजे पुन्हां मिळत नाहींत म्हणून येथील ३ / ४ मारवाड्यांच्याकडून शेकडोवेळां रकमा व्याजानें घेत आणि देत आलो आहे. हा असा व्यवहार कित्येक वर्षे अव्याहत चालूं होता. मी मागितल्यावर क्षणाचाहि विचार न करतां त्या अतिस्वस्ताईच्या काळांत ते ५०/१०० रूपये सहज देत असत. हा काय प्रकार आहे हे बरेच दिवस माझ्या लक्षांत आलें नाहीं. आपलें काम होतें ना? म्हणून मी गप्प बसत असे. एकदां अचानक हा गौप्यस्फोट झाला. त्याचे असें झालें कीं, एका मारवाड्याकडे मी ५० रूपये मागितले. त्याने ते लगेच दिले. मात्र मला बाजूस घेऊन तो हळूं आवाजांत बोलला. त्यावेळीं माझ्या ध्यानीं आले कीं, मी त्यांच्याकडून ५ टक्यांनी रकमा घेऊन बाहेर १० टक्यांनी व्यवहार करतो अशी त्यांची

पक्की समजूत झाली आहे. तो हळूं आवाजांत काय बोलला माहीत आहे? तो म्हणाला,“हे पहा साहेब, हे असे ५०/१०० कशाला नेतां, एकदम ५०० रूपयेच घेऊन जा ना. मुद्दल सावकाश द्या. वरचे पैसे देत जा म्हणजे झाले.त्यावेळीं माझी खरी ट्यूब पेटली आणि या कोड्याचा मला उलगडा झाला. सावकार लोकांचा व्याजाचा व्यवहार मला ऐकून माहीत होता. मी त्याला तश्याच भ्रमांत ठेवला आणि समयसूचकतेनें पट्कन उत्तर दिले. म्हणालो, “हे पहा शेटजी, पैशाची वसुली करणें फार अवघड काम आहे. उगीच हाव धरून जिवाला घोर लावून घेण्यांत कांहीं अर्थ नाही.” ब्राह्मण माणसं डोकेबाज असतात असे म्हणून त्याने माझी पाठ थोपटली.

मी त्याला पुस्तकासाठीं पैसे लागतात असे खरे सांगितले असते तर

२५ रूपयालाहि त्याने मला चार हेलपाटे घालण्यास लावले असते. आणि इतरापाशी म्हटला असता, ‘‘माणूस तसा चांगला आहे. पण याला व्यवहार नाही. बुकासाठीं कुणी व्याजानी पैसे घेतं काय?’’

ध्येयवादी व्यक्तीला लोक मूर्ख समजतात. आतां मूळ विषयाकडे वळतो. सांगायचें तात्पर्य असे कीं मी कोणापुढे पैशासाठीं कधी हात पसरला नाही. प्रकाशनपूर्व किंमत किती आणि नंतर किंमत किती असा विचार कधीहि केला नाही. लाईटचे बील कधी वळेवर भरले नाही. नेहमीच दंडासहित रक्कम भरत आलो आहे. तळेगांवांत राहण्यास आल्यापासून मी कधी रेशन आणले नाही. भाजीबाजारांत फिराफिरी करून कधी वेळ घालविला नाही. मी पैशाची कधी उधळपट्टी केली नाही पण काटकसरीपणा

माझ्या स्वभावांतच नाही. माझे जीवन एक मुक्तछंद आहे.

अशाप्रकारे शेकड्यावारी रकमा खर्चून वेळीं अवेळीं पुस्तकें खरेदी केली. यावेळींच हें असे कसे घडले? याचें उत्तर अगदी थोड्याच दिवसांत ध्यानीं आले कीं, ज्या गुरूकृपेमुळें तुम्हीं हें लेखन-कार्य केलें त्याच गुरूकृपेमुळें माझी,थोड्या कडक शब्दांत सांगतो, बुद्धीची मस्ती आणि पैशाची घमेंड न कळत लुप्त झाली. आणि एका गुरूभक्ताकडे एका गुरूकृपाकटाक्ष वळलेल्याची पावलें वळली. या घटनेचा अन्वयार्थ हा आणि हाच आहे. एऱ्हवी दहा रूपयासाठीं तुम्हांपुढे उभा राहून मानहानी करून घेतली असती? मुळीच नाही. मात्र यावेळीं मोठेपणा, मानहानी या दोहोंतून मन विनिर्मुक्त झालें. आणि ‘धावे जातीपाशीं जाती’ असा समसमासंयोग झाला. नंतरच्या काळांत आपल्या साहित्यावर केव्हढे मोठे

लेखन केलें, त्याचा श्रीगणेशा ‘गुरूचरित्र’ प्रकाशनापासून झाला. म्हणून म्हणतो कीं, ‘सुबोध गुरूचरित्रा’ च्या वेळची फिरून झालेली आपली नवी भेट हा दुग्ध-शर्करा योग होता. असे या घटने विषयीं म्हणावे वाटतें.

जन्मोजन्मीं आम्हीं। बहूं पुण्य केलें।
तेव्हां या विठ्ठलें। कृपा केली।।

आम्हीं म्हणजे आपण दोघांनी. बहू पुण्य केले तेव्हां या विठ्ठलें ही अशी आपली नव्यानें भेटीची कृपा केली.

कांहीं आक्षेपकांचे आक्षेप मोठे तऱ्हेवाईक असतात. आतां हाच आक्षेप पहा, त्यांचें म्हणणें असे कीं, या अशा लेखकांचें लेखन-कार्य म्हणजे पोटापाण्याचा व्यवसाय. ललित साहित्याला मंदी आली म्हणजे हे लोक धार्मिक साहित्याकडे

वळतात. चटकदार लिहिण्यांत तर हे पट्टीचे वाकबगार आणि भाविक श्रद्धाळू लोकांची कधीच वाण नसते. उलट त्यांची संख्या सदैव मोठी आहे. त्यामुळें या लेखकांचा धार्मिक पुस्तकें लिहिण्याचा व्यवसायहि खूप तेजींत चालतो.

मला वाटतें जर ही वस्तुस्थिती असेल तर यावर आक्षेप कशासाठीं घ्यायचा? या विषयीं त्यांची खरी पोटदुखी अशी आहे कीं, साधुसंत अथवा पारमार्थिक क्षेत्रांतील लोकांनी धार्मिक विषयावर लिहावे. यावर लिहिण्याचा खरा अधिकार त्यांचाच. हे ललित लेखक यांत व्यर्थ लुडबुडतात आणि आपल्या व्यक्तित्त्वाला हेंहि एक अंग आहे असे दर्शवून समाजांत मिरवतात.

आक्षेपक ही गोष्ट ध्यानीं कां घेत नाहीत कीं, उभे आयुष्य ज्यांनी परमार्थांत

घालविले अशा कित्येकांना कितीतरी वर्षांनंतर कठोर आत्मपरीक्षणाअंतीं स्पष्ट ध्यानीं आले कीं, ज्याला आपण प्रामाणिकपणें परमार्थ समजत होतो आणि लोकहि तसेच मानत होते तो परमार्थ नसून आपल्या जीवनाचा तो एक.*Mold* आहे, तो एक *Pattern* आहे, एक साच्या आहे. जीवनाच्या एका मानीव चौकटीलाच आपण परमार्थ समजत आलो आहोत. किंबहुना आपल्याला हें एक व्यसनच जडले आहे. ही वस्तुस्थिती ध्यानीं आल्यावर अतीव पश्चात्तापाने ते गुरूकृपेला पात्र झाले आणि आतां खऱ्या परमार्थाचा शुभारंभ झाला.

आपल्या बाबतींत नेमकी याउलट स्थिती कशावरून नसेल? दुसऱ्या विषयीं बोलण्यापूर्वी कठोर आत्मनिरीक्षण करावे म्हणजे सर्व आपोआप निवळेल आणि "विश्वं तत् भद्रं यत् अवन्ति देवा:" याची साक्ष पटेल. *'God is in his heven*

*and all right on the world.'* हे ललित लेखक हा धार्मिक लेखनाचा उद्योग कां करतात? याला माझें उत्तर असे कीं, पोपला कोणीतरी एकदां विचारले कीं, तूं हे झगे कां घालतोस? इतका नटतोस कां? त्याने उत्तर दिले, "तुम्ही याला हवेतर ढोंग म्हणा. पण मी हे बुद्धिपुर:सर करतो आहे. उद्देश एवढाच कीं, हे करतां करतां नकळत श्रद्धेचा स्पर्श होईल. जीवनाला योग्य ती दिशा मिळेल."

आपल्या बाबतींत हें असेच कशावरून नसेल? जीवनांत मनाची ऋजुता असेल तर धंद्याचा धर्म होतो. व्यापार हा व्यापार न राहतां भक्ति-प्रेमाचा व्यवहार होतो. रामाचा मार्ग नेहमीच गूढ असतो. हे आक्षेपक स्वत:ला शहाणे समजत असतात पण प्रत्यक्षांत ह्यांना काडीची योग्यता अथवा अधिकार नसतो. त्यांच्या आक्षेपांना 'फाल्गुने बालका इव।' यापेक्षां जास्त किंमत देण्याचें कारण नाहीं.

आतां मी माझ्याविषयीं सांगतो. मी एका वर्षी माझ्या बहिणीसाठीं पारायण केलें. अगदी सोवळ्यांत. प्रथम संध्या, गायत्री मन्त्र जप, नंतर पाठास आरंभ.— असे त्यासंबंधीच्या सर्व नियमांचे पालन करून. दाढी करायची नाही, सीमा ओलांडायची नाही. इत्यादि.

पहिला पाठ केल्यावर मला 'गुरूचरित्रा' च्या अभ्यासाची प्रेरणा झाली. पाठ झाल्यावर त्याच सोवळ्यांत, त्याच आसनावर बसून कमीत कमी १ तास तरी, तळटीपा आणि कामतांची सुदीर्घ प्रस्तावना व परिशिष्टें याद्वारा अभ्यास करीत असे. यापूर्वी सोवळ्याच्या आणि इतर नियमांच्या भयामुळें हा ग्रंथ मी पाहिला देखील नव्हता. यावेळीं मात्र अगदी ठिय्या देऊन अभ्यास केला. दाढी, सोवळे, भस्माचे त्रिपुंड्र असे त्याला साजेसे मानसिक

वातावरण लाभल्यामुळें या ग्रंथराजाचें यथार्थ आकलन करतां आले. आतां ज्ञानेश्वरी, भागवत, दासबोध याप्रमाणे हा ग्रंथ माझ्या परम प्रेमाचा विषय झाला आहे.

वर उधृत केलेली कामतांची प्रत मला अभ्यासाला अतिशय उपयोगी झाली. याशिवाय त्याला सहाय्यक होईल अशा कांहीं पुस्तकांचा संग्रह केला. तो याप्रमाणे—

१ नामचिंतामणी— पूज्य कामत.
२ गुरूचरित्रांतर्गत गुरूगीता—पू. कामत.
३ शतश्लोकी गुरूचरित्र— पू. कामत.
४ गुरूचरित्र संशोधनाची स्वतंत्र प्रस्तावना— पू. कामत.
५ नृसिंह सरस्वति चरित्र— श्री.अप्रबुद्ध.
६ नृसिंह सरस्वति प्रणीत— आत्मसाक्षात्कार—श्री. तुळपुळे.
७ गुरूचरित्रामृत— गद्य सारांशरूप. दत्तोपासना—स. कृ. फडके, पनवेल.

याशिवाय मासिकांतील लेख, वर्तमानपत्रांतील कात्रणें असाहि कांहीं संग्रह केला. या प्रान्तांतील कांहीं निष्ठावंतांच्या गाठीभेटीहि घेतल्या. याद्वारें माझ्या अभ्यासाला एकप्रकारची पूर्णता आली.

आपले ‘सुबोध गुरूचरित्र’ असे बोर्ड लागले यावरून कांहींतरी नेमक बोध होईल का? आणि मला तसा तो झाला नाहीच. मी धरून चाललो होतो कीं, ‘सुबोध’ म्हणजे गोष्टीरूपाने व सारांशरूपांत तयार केले असेल. यापेक्षां जास्तीतजास्त मानले तरी ‘भावार्थ ज्ञानेश्वरी’ इतकी याची मजल जाईल.

पण पाहतो तों चमत्कारच घडला. हें ध्यानींमनींहि नव्हते. येव्हढे काम! एव्हढ्या मेहनतीचें! मी थक्कच झालो. जसजसे हें चाळीत गेलो तसतसे अंत:करण भारावून गेले. हें अघटीत घडले. अहो, ‘सुबोध

गुरूचरित्र' असे नांव देऊन केव्हढी फसगत केलीत आमची! केव्हढ्या भ्रमांत ठेवलंत आम्हाला! 'सुबोधता' तर आपल्या लेखनाचा सर्वात मोठा गुण आहे. यासाठीं महाराष्ट्रांत लांबवर आपलें नांव झाले आहे. मात्र असले चमत्कारिक नांव देऊन केव्हढा धक्का दिला वाचकांना! निदान माझी तरी तशी गत झाली.

प्रत्येक ओवीचा, त्यांत पुन्हां शब्दशः अर्थ आणि संपूर्ण ५१ अध्याय. केव्हढा दीर्घोद्योग केला! केव्हढे परिश्रम घेतले! गुरूभक्तावर हे केव्हढे उपकार आहेत! ही संपूर्ण अर्थाची म्हणजे 'सार्थ गुरूचरित्रा' ची प्रेरणा तुम्हांस कशी काय झाली!

तुम्हीं हें कशासाठीं केले असे मला नेहमी वाटतें. याचें कारण सांगतो. या अर्थाचा किती लोकांना उपयोग होणार आहे. एकतर पारायण करणारे श्रद्धाळू

भाविक—जे बहुसंख्येने या महाराष्ट्रांत आहेत—त्यांना अर्थाशीं कांहींहि कर्तव्य नाही. त्यांना पारायणांतून दिव्य सामर्थ्य प्राप्त करून घेण्याची अथवा इच्छित हेतू साध्य करण्याची मुख्यत्वे प्रेरणा असतें. म्हणजेच या एकमेव प्रेरणेने ते प्रवृत्त झालेलें असतात.

आतां दुसरा बुद्धिवाद्यांचा वर्ग. हा पारायणाच्या विरूद्ध नाही. पण त्याचें म्हणणें असे कीं, 'गुरूचरित्र' हा कथानकाने आणि चमत्काराने भरलेला ग्रंथ आहे. तो आबालसुबोध आहे. असे असतां, त्याच्या अर्थाची काय जरूरी आहे? त्यांत तत्त्वज्ञान अगदी थोडे आणि तेंहि अगदी सरळ-साधे आहे. त्याचाहि अर्थ करण्याची मुळीच आवश्यकता नाही. अशा स्थितींत अर्थ करण्याचें हें व्यर्थ कालहरण कशासाठीं?

दोन्हीं पक्षांनी दोन टोकें गाठली आहेत. त्यांना या ग्रंथराजाचें खरे मोल

कळलेच नाही. बिंब-प्रतिबिंब न्यायाने विषय किती खोलवर उतरतो याची त्यांना कल्पना नाही. कानडी धर्तीवर गेलेल्या मराठीचा गोडवा आणि अनुवादसमयीं उपयोजिलेली आजच्या मराठी भाषेची अपूर्व माधुरी या दोन्ही गोष्टी नितांत रमणीय आहेत. याशिवाय आणखीन कितीतरी विषय आहेत. पण या सर्वांविषयीं अतिशय खेदाने म्हणावे लागते कीं, हे दोन्हीहि पक्ष अरसिक आहेत. अशा या दोन्हीं पक्षांच्या हातीं हें 'सुबोध गुरूचरित्र' जावे असे या लेखकाच्या 'शिरसी मा लिख' अशी विधात्याला प्रार्थना करावी वाटते.

मात्र माझ्यासारख्या अभ्यासकावर तुमच्या दोन्हीं पुस्तकांनी महदुपकार केले आहेत. यांतून उतराई होता येणार नाही. किंबहुना मला तसे व्हायचेहि नाही. हें ऋण सदैव शिरीं धरावे आणि स्वताला धन्य मानावे असेच वाटतें.

मागील यादीशिवाय गुरूचरित्रावरील अगदी बारिकसारिक पुस्तकेंहि मी जमा केली आहेत. गुरूचरित्रावर कोणी कांहींहि लिहिले तरी तें वाचण्यास मला फार आवडते. अशा स्थितींत तुमची दोन पुस्तकें अथवा ग्रंथ मला अतिप्रिय झाले आहेत. आपल्या या दोन कृतीसाठीं माझ्याजवळ खरोखर शब्द नाहीत.

आपण प्रस्तावनेंत निवेदन केलेल्या गोष्टी अगदी खऱ्या आहेत. या अडचणी ओलांडून जाणे हें येऱ्यागबाळ्याचें काम नाही. आपण हा अर्थ लिहितांना, हा अनुवाद करतांना फार काळजी घेतली आहे, फार सावधपण राखलें आहें. साहित्यिकांना आव्हान देणारा असा हा ग्रंथ आहे. याचें हें आव्हान आपण समर्थपणें पेललें आहे. या ग्रंथराजाचा अनुवाद करणारा खरोखर भाग्यवान मानला पाहिजे. कित्येक अध्यायांचा अर्थ करण्याचें काम

मोठ्या जिकिरीचें व कष्टाचें आहे. आपण तें मानपाठ मोडून केले. आपण हें किती भरीव व सुंदर कार्य केलें आहें! असे वाटतें कीं, आपल्या जीवनांत कोठेतरी श्रीगुरूचें पदार्पण झाले असले पाहिजे त्याशिवाय हें घडतें ना!

गुरूचरित्र संपादन आणि अर्थलेखन हा आपल्या आयुष्यांतील मोलाचा काळ आहे. भविष्यांतील भव्य व उदात्त जीवनाची ती नांदी आहे. गुरूसेवा कधीहि व्यर्थ जात नाही. हा माझा स्वत:चा आणि अनेकांचा अनुभव आहे. श्रेष्ठ पुरूषांचा सहवास लाभतो. जीवनाला अर्थ प्राप्त होतो. श्रीगुरूचें देणें फार तोलामोलाचें असतें. जें कोणीहि देऊं शकणार नाहीं तें गुरूसेवा देतें. दोन-तीन प्रसंग अथवा योग असे आहेत कीं, मला याचा प्रत्यक्ष प्रत्यय आला. श्रीगुरूसेवा ही चुंबकशक्ति आहे कीं, अधिकारी व्यक्ति त्याचेकडे आपोआप

ओढल्या जातात, दोन सुयोग्य व्यक्तींच्या भेटीचा योग येतो, चित्तशुद्धि होते, जीवनाचा स्तर उंचावतो, जीवन आंतून उमलल्याशिवाय बाहेरून कांहींहि मिळत नसतें याची जाणीव होते. याचीच पुढील परिणती अशा अनुभवांत होते कीं, खरी मदत आंतूनच मिळत असते. बाहेरून मिळते हा भ्रम असतो. बाहेर ती ती निमित्तें असतात. त्यांना गौणार्थानें महत्व आहे, मुख्यार्थानें नाही. 'हा स्वधर्मु जै सांडे। कुकर्मीं रति घडे।।' असे झाल्यास गौणार्थ मुख्यार्थ होऊन आत्मभान नष्ट होते. आणि गुरूकृपा लोप पावते.

मला वाटते हें गुरूचरित्र पोथी स्वरूपांत छापावे. वरच्या पानावर ओव्या, त्याला जोडून असलेल्या खालच्या पानावर त्या ओव्यांचा अर्थ. असे जर छापले तर 'मामांची ज्ञानेश्वरी' तसे 'गो.नी.चें 'सार्थ गुरूचरित्र' अशी या ग्रंथाची प्रसिद्धी होईल.

तुमच्या श्रमावर हें असे शिक्कामोर्तब होईल.

आतां मनांत एक विचार असा येतो कीं, येव्हढे हें मोलाचें कार्य आपण केले पण लोकांचें हवे तेव्हढे लक्ष कां जात नाहीं? याचे उत्तर हेंच कीं, पूज्य कामतांनी एवढी उरस्फोड करून शुद्ध पाठावृत्ति तयार केली आणि सुदीर्घ प्रस्तावना त्याला जोडली. त्याकडे किती लोकांचें लक्ष गेले, तेव्हां तें आपल्याकडे जाणार आहे?

लोकांना एवढेच सांगावे वाटते कीं, बाबांनो, दांडेकरांची इतर धार्मिक पुस्तकें वेगळी आणि हें अगदीच वेगळे आहे. येथे साहित्यिक लोपला आहे. म्हणजे ‘असतचि सरे’ असा झाला आहे. आणि गुरूकृपेचा झोत ज्याच्या जीवनांत प्रविष्ट झाला आहे अशा एका गुरूभक्ताने केलेलें हें लेखन आहे. मानपाठ मोडून गुरूसेवेसाठीं खपून

या माणसाने हें काम केलें आहे. सच्ची गुरूसेवा आहे ही! कुठलाहि पूर्वग्रह न ठेवतां याकडे पहाल का?

तुम्हीं पहा नाहीतर पाहूं नका. त्याला त्याची पर्वा नाही. गुरूप्रेमाने तो तृप्त झाला आहे आणि प्रकाशकांचे हवाली करून व्यावहारिक अर्थानेहि तो कृतार्थ झाला आहे. प्रश्न आहे तुमचा-आमचा. लाथ माराल तर करंटे ठराल. शिरीं धराल तर भाग्यवान ठराल भगवान व्हाल!

आप्पा ठोंबरे

दिनांक : १०/१२/१९७१